महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळातील कामगारांना, कामगार करार प्रतिपूर्तीपोटी रु. ३५२.०० कोटी रोखीने प्रदान करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्र. एसटीसी-०९१४/प्र.क्र.५०८/परि-१,**

गृह विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : १६ जुलै, २०१५.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७ एप्रिल, २०१५.

२) गृह विभाग, पत्र क्र.एसटीसी-३४०४/सीआर ७४/परि-१, दि.२१ जुलै, २००४.

३) गृह विभाग, पत्र क्र.एसटीसी-३४०४/सीआर ७४/परि-१, दि.२३ ऑगस्ट, २००४.

४) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य परिवहन महामंडळ, मुंबई-८ यांचे पत्र क्र.राप/लेखा/सा-१/२७०२, दि.२४ जुलै, २०१४.

५) गृह विभाग, शासन निर्णय क्र.एसटीसी-३४००/६३१/सीआर-३१/परि-१, दि.२०.६.२०००.

६) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य परिवहन महामंडळ, मुंबई-८ यांचे पत्र क्र.राप/लेखा/सा-१/१६२६, दि.१७.६.२०१५.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास कामगार करार २०००-२००४ करिता प्रतिवर्ष रु.६०.०० कोटी प्रमाणे एकूण रु.२४०.०० कोटी आणि कामगार करार २००४-२००८ करिता प्रतिवर्ष रु.२८.०० कोटी प्रमाणे रु.११२.०० कोटी असे एकूण रु.३५२.०० कोटी शासनातर्फे प्रवासी करातून समायोजित करुन देण्याचा निर्णय दि.२८.७.२००४ रोजी मा.मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखालील बैठकीत घेण्यात आला होता. तथापि, संदर्भाधिन क्र.५ येथील दि. २०.६.२००० च्या शासन निर्णयान्वये प्रवासी कराची रक्कम शासनाच्या विविध सवलत प्रवास योजना मुल्यापोटी आधीच समायोजित करण्यात येत आहे. त्याचप्रमाणे प्रवासी कराची रक्कम ही सवलत प्रवास योजना मुल्यापेक्षा कमी असल्याने सवलत प्रवास योजना मुल्य पूर्णपणे समायोजित होत नाही. त्यामुळे कामगार करारासाठी सवलत प्रवास योजना मुल्याच्या प्रतिपूर्तीखालील अर्थसंकल्पीत तरतूदीतून महामंडळास उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास सन २०००-२००४ व २००४-२००८ करिता कामगार करार प्रतिपूर्तीपोटी सन २०१५-१६ या आर्थिक वर्षासाठी मागणी क्रमांक बी-३,

लेखाशिर्ष २०४१ अंतर्गत अर्थसंकल्पित तरतूदीमधून रु.३५२.०० कोटी तरतूद रोखीने प्रदान करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. वरील खर्च मागणी क्रमांक "बी-३, लेखाशिर्ष २०४१-वाहनावरील कर-००१-संचालन व प्रशासन (०१) परिवहन आयुक्त (०१) (०१) आस्थापना- परिवहन आयुक्त-योजनेतर (दत्तमत्त), (२०४१ ००१८) ३३-अर्थसहाय्य" या लेखाशिर्षाखाली सन २०१५-१६ च्या मंजूर तरतूदीतून करण्यात यावा.

३. यासाठी परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत असून, त्यांच्या कार्यालयातील आहरण व संवितरण अधिकारी असलेले लेखाधिकारी यांनी सदर रक्कम आहरित करुन महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास अदा करावी.

४. महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास वरील निधी अदा करण्यासंदर्भात "महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळातील कामगारांचे वेतन करार करतांना असे निदर्शनास आलेले आहे की, वेतन करार करताना कोणताही निकष न लावता मागील करारातील रकमा समोर ठेवून वाटाघाटी करण्यात आल्या असून, यापुढे अशा प्रकारची पध्दत न अवलंबिता काही निकष आणि उत्पादकता यांची सांगड घालून तसेच महामंडळाची आर्थिक स्थिती विचारात घेवून याबाबत विचार करण्यात यावा व त्या दृष्टीकोनातून करार करताना अशा प्रकारची तरतूद करारात करण्यात यावी," असे निर्देश देण्यात येत आहेत.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१०३/१५/सा.उ., दि.२९.६.२०१५ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७१६१४२६०६६४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Nitin J Ghiratkar

Digitally signed by Nitin J Ghiratkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Nitin J Ghiratkar
Date: 2015.07.16 17:38:03 +05'30'

**(नि. ज्यो. घिरटकर)**
कक्ष अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई
२. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
३. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षण), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर

४. महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परिक्षा), मुंबई
५. महालेखापाल १/२ ( लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७. निवासी लेखा परिक्षण अधिकारी, मुंबई
८. वित्तिय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई
९. वित्त विभाग (व्यय -८/साऊ अर्थसंकल्प-१०/अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
१०. गृह विभाग (बीयुडी-१/बीयुडी-२/परिवहन-३/परिवहन-४), मंत्रालय, मुंबई
११. निवडनस्ती/परिवहन-१.